आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून अधिकाऱ्यांची घोषणा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२०/प्र.क्र.४४/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- १५ जुलै, २०२०

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.७.२०१७ व दि.१.६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये शासकीय जाहिरात वितरण धोरणाची अंमलबजावणी कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार या विभागाच्या माध्यम आराखड्याबाबत शासन स्तरावरुन आवश्यक त्या मान्यता घेऊन शासन निर्णय निर्गमित करण्यात येतात. माध्यम आराखड्याबाबत समाज कल्याण आयुक्तालय स्तरावरुन देयके अदा करण्याव्यतिरिक्त कोणतीच कार्यवाही करण्यात येत नसल्याने जाहिरात व प्रसिध्दीबाबतच्या या विभागाच्या ३ लेखाशिर्षातील २६, जाहिरात व प्रसिध्दी या उद्दिष्टासाठी आयुक्त समाजकल्याण ऐवजी “अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग” यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच “सह सचिव/ उप सचिव (रोखशाखा), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग” यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडून राबविल्या जाणाऱ्या योजनांची जाहिरात व प्रसिध्दीसाठी असलेले १) अनुसूचित जाती उपयोनांची योजनांची जाहिरात -लेखाशिर्ष (२२२५३७२५), २) अंधश्रध्दा निर्मूलन योजनांची जाहिरात - लेखाशिर्ष (२२३५B३६१) तसेच ३) ज्येष्ठ नागरिक योजनांची जाहिरात - लेखाशिर्ष (२२३५B३१६) या लेखाशिर्षांमधील “२६, जाहिरात व प्रसिध्दी” या उद्दिष्टासाठी अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच सह सचिव/ उप सचिव (रोखशाखा), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७१५१२१९५५३६२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2020.07.17 12:04:14 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सह सचिव/ उप सचिव (रोखशाखा) तथा नियंत्रक अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग
४) अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारा, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) वित्त विभाग( वित्तीय सुधारणा/ व्यय-१४/ अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
९) रोखलेखापाल, रोखशाखा, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग